**जून ते ऑक्टोबर, २०२४ या कालावधीतील अतिवृष्टी व पूर या नैसर्गिक आपत्तीमध्ये बाधित होणाऱ्या नागरिकांना विशेष दराने मदत करणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**महसुल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. सीएलएस-२०२४/प्र.क्र.१८२/म-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ८ ऑगस्ट, २०२४.

**वाचा :-**

१)शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सीएलएस-२०१२/प्र.क्र. १५७/म-३, दि. ३०/०१/२०१४
२)शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सीएलएस-२०२२/प्र.क्र. ३४९/म-३, दि. २७/०३/२०२३
३)शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सीएलएस-२०२३/प्र.क्र. ५२/म-३, दि. २२/०६/२०२३
४)शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. सीएलएस-२०२३/प्र.क्र. १६८/म-३, दि. २८/०७/२०२३

**प्रस्तावना :-**

राज्यात उद्भवणाऱ्या विविध नैसर्गिक आपत्तीमध्ये बाधित होणाऱ्या नागरिकांना मदत देण्यासाठी आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५ मधील कलम ४८ (२) अन्वये राज्य आपत्ती प्रतिसाद निधी (SDRF) ची स्थापना करण्यात आली आहे. या निधीमध्ये केंद्र शासनाकडून ७५ टक्के व राज्य शासनाकडून २५ टक्के या प्रमाणे अंशदान दिले जाते. राज्य आपत्ती प्रतिसाद निधीमधून केवळ चक्रीवादळ, दुष्काळ, भूकंप, आग, पूर, त्सुनामी, गारपीट, दरड कोसळणे, बर्फखंड कोसळणे (हिमवर्षाव), ढगफुटी टोळधाड, थंडीची लाट व कडाक्याची थंडी या १२ नैसर्गिक आपत्तीमध्ये बाधित होणाऱ्या नागरिकांना मदत अनुज्ञेय आहे.

२. केंद्र शासनाने विहित केलेल्या १२ नैसर्गिक आपत्ती व्यतिरिक्त राज्य शासनाने शासन निर्णय, महसूल व वन विभाग दि. ३० जानेवारी, २०१४ अन्वये घोषित अवेळी पाऊस, अतिवृष्टी, वीज कोसळणे, समुद्राचे उधाण व आकस्मिक आग तसेच शासन निर्णय, महसूल व वन विभाग दि.२२ जून, २०२३ अन्वये घोषित, सततचा पाऊस या आपत्तीमध्ये बाधित होणाऱ्या नागरिकांना देखील राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या दरानुसार मदत देण्याचे धोरण निश्चित केले आहे. शासन निर्णय, महसूल व वन विभाग दि.२७ मार्च, २०२३ अन्वये राज्य आपत्ती प्रतिसाद निधीचे मदतीचे सुधारित निकष व दर दि.१ नोव्हेंबर, २०२२ पासून लागू करण्यात आले आहेत.

३. दि. १९ ते २३ जुलै, २०२३ मध्ये राज्यातील काही भागात झालेल्या अतिवृष्टीमुळे बाधित झालेल्या नागरिकांना पुरेशी मदत व्हावी याकरीता संदर्भ क्र. ४ च्या दि. २८ जुलै, २०२३ च्या शासन निर्णयान्वये अट शिथिल करुन विशेष दराने मदत मंजूर करण्यात आली होती. सन २०२४ च्या पावसाळी हंगामामध्ये म्हणजेच जून ते ऑक्टोबर, २०२४ या कालावधीत सुध्दा अतिवृष्टी व पूर

यासारख्या नैसर्गिक आपत्तीमुळे बाधित होणाऱ्या नागरीकांना पुरेशी मदत तातडीने मिळावी याबाबत मा. मंत्रिमंडळाच्या दि. ३० जुलै, २०२४ च्या बैठकीत, दि. २८ जुलै २०२३ च्या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या विशेष दरास १ वर्षाने मुदतवाढ देण्याबाबत निदेश देण्यात आले आहेत. त्याअनुषंगाने खालीलप्रमाणे शासनाने निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय :-

जून ते ऑक्टोबर, २०२४ या चालू पावसाळी हंगामामध्ये कालावधीत राज्यातील विविध जिल्हयात अतिवृष्टी व पूर यासारख्या नैसर्गिक आपत्तीमुळे झालेल्या नुकसानीकरिता खालील बाबींकरिता विशेष दराने मदत देण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

| अ. क्र. | मदतीची बाब व निकष | राज्य आपत्ती प्रतिसाद निधीचे मदतीचे प्रचलित दर | राज्य आपत्ती प्रतिसाद निधीचे मदतीचे निकष व विशेष दर | मदत निधी देण्यासाठी कार्यपध्दती |
|---|---|---|---|---|
| १ | दोन दिवसापेक्षा अधिक कालावधीकरिता क्षेत्र / घर पाण्यात बुडालेले असल्यास/घरे पूर्णतः वाहून गेली असल्यास / पूर्णतः क्षतीग्रस्त झाली असल्यास | अ) प्रतिकुटुंब रु.२५०० कपड्यांचे नुकसानीकरिता<br>ब) प्रतिकुटुंब रू.२५०० घरगुती भांडी/वस्तु यांच्या नुकसानीकरिता | अ) प्रतिकुटुंब रु.५००० कपड्यांचे नुकसानीकरिता<br>ब) प्रतिकुटुंब रू.५००० घरगुती भांडी/वस्तु यांच्या नुकसानीकरिता<br>टिप दोन दिवसापेक्षा अधिक कालावधीकरिता क्षेत्र / घर पाण्यात बुडले असल्याची अट शिथिल करण्यात येत आहे. | वाढीव दराने होणारा रु.५००० खर्च राज्य शासनाच्या निधीतून म्हणजेच लेखाशिर्ष २२४५ २१९४ मध्ये खर्ची घालण्यात यावा.<br>दोन दिवसापेक्षा अधिक कालावधीकरिता क्षेत्र / घर पाण्यात बुडले असल्याची अट शिथिल केल्यामुळे द्यावयाच्या मदतीच्या प्रकरणात संपूर्ण निधी (रु.१०,०००) राज्य शासनाच्या निधीतून म्हणजेच लेखाशिर्ष २२४५ २१९४ मध्ये खर्ची घालण्यात यावा. |
| २ | दुकानदार | नैसर्गिक आपत्तीमुळे दुकानदारांना द्यावयाच्या | जे स्थानिक रहिवाशी आहेत, ज्यांचे नाव स्थानिक | याबाबीसाठी होणारा खर्च राज्य शासनाच्या निधीतून करण्यात |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| | | मदतीची बाब राज्य आपत्ती निधीमध्ये समाविष्ट नाही. | मतदार यादीत आहे व जे रेशनकार्ड धारक आहेत अशा दुकानदारांपैकी अधिकृत (नोंदणीकृत व महाराष्ट्र दुकाने व आस्थापना अधिनियम १९४८ खालील परवानाधारक) दुकानदार यांना पंचनाम्याच्या आधारे प्रत्यक्ष झालेल्या नुकसानीच्या ७५ टक्के रक्कम किंवा जास्तीत जास्त रू.५०,०००/- पर्यंत आर्थिक मदत देण्यात यावी. | यावा. (लेखाशिर्ष २२४५ २३८१) |
| ३ | टपरीधारक | नैसर्गिक आपत्तीमुळे टपरीधारकांना द्यावयाच्या मदतीची बाब राज्य आपत्ती निधीमध्ये समाविष्ट नाही. | जे स्थानिक रहिवाशी आहेत, ज्यांचे नाव स्थानिक मतदार यादीत आहे व जे रेशनकार्ड धारक आहेत अशा टपरीधारकापैकी अधिकृत (नोंदणीकृत व परवानाधारक) टपरीधारक यांना पंचनाम्याच्या आधारे प्रत्यक्ष झालेल्या नुकसानीच्या ७५ टक्के रक्कम किंवा जास्तीत जास्त रू.१०,०००/- पर्यंत आर्थिक मदत देण्यात यावी. | याबाबीसाठी होणारा खर्च राज्य शासनाच्या निधीतून करण्यात यावा. (लेखाशिर्ष २२४५ २३८१) |

२. मदतीची रक्कम प्रदान करताना संदर्भाधीन शासन निर्णयामध्ये विहित केलेल्या इतर अटी व शर्ती लागू राहतील.

३. पंचनामे करण्यात आल्यानंतर लाभार्थी निश्चित करण्यात यावेत. त्यानंतरच यासाठी निधी वितरित केल्यानंतर रक्कम आहरित करून लाभार्थ्यांच्या बँक खात्यामध्ये हस्तातंरित करावी. सदर निधी अनावश्यकरित्या आहरित करून बँक खात्यामध्ये काढून ठेवण्यात येवू नये. लाभार्थ्यांना मदत वाटपाची कार्यवाही पुर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांची यादी व मदतीचा तपशील जिल्हयांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावा.

४. वाटप करावयाच्या निधीची अचूक परिगणना करुन बाधितांनाच मदत वाटप होईल व वाटप करावयाच्या निधीची द्विरुक्ती होणार नाही, या अटीच्या अधिन राहून निधी आहरित व वाटप करण्याची संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक: ३२८/२०२४/व्यय-९, दि. ७/०८/२०२४ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२४०८०८१७५३३८२९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

KAILAS ARJUN GAIKWAD

Digitally signed by KAILAS ARJUN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=47D160717AE29C2D2661B5275D8B9B4CFAE93893BE65A27853145A4C04D865CD, cn=KAILAS ARJUN GAIKWAD
Date: 2024.08.08 18:08:10 +05'30'

**( कैलास गायकवाड )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानभवन, मुंबई
४. विधानमंडळाचे सर्व सन्माननीय सदस्य,
५. अपर मुख्य सचिव (वित्त)
६. प्रधान सचिव (कृषी), मंत्रालय, मुंबई,
७. सर्व विभागीय आयुक्त.
८. सर्व संबंधित जिल्हाधिकारी.
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,

१०. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
११. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१२. वित्तिय सल्लागार व सहसचिव मदत व पुनर्वसन प्रभाग, मंत्रालय, मुंबई
१३. अधिदान व लेखा अधिकारी, बृहन्मुंबई.
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१५. कार्यासन अधिकारी (म-७/म-११/ब-१), मदत व पुनर्वसन प्रभाग, मंत्रालय, मुंबई
१६. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६), मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती (कार्यासन / म-३.